उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई जिल्हा क्र.१ यांच्या अधिनस्त असणारे निरीक्षक, वैध मापन शास्त्र, माहिम विभाग या कार्यालयाचे प्रलंबित भाडे अदा करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन ज्ञापन क्रमांक : वैमाशा-२०२४/प्र.क्र.६८/ग्रासं-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार), मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ६ मार्च, २०२५

**संदर्भ** :-१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.-विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि-१७ एप्रिल, २०१५.
२) नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्र. भापअ (२८)/१५२४/प्र.क्र.१०/वैमाशा-२/५७७, दि.२७ जून, २०२४ चे पत्र.

**ज्ञापन :-**

सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई महानगर विभागीय कार्यालय यांचे अधिनस्त उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई जिल्हा क्र.१ यांच्या अधिनस्त असणारे निरीक्षक, वैध मापन शास्त्र, माहिम विभाग कार्यालय सुदर्शन बिल्डींग, तळ मजला, रूम. नं.१,२,३, गोखले रोड, जाखादेवी रोड, दादर पश्चिम, मुंबई-२८ येथील भाड्याच्या जागेत कार्यरत आहेत. सदर कार्यालयाचे भाडे प्रशासकीय कारणास्तव प्रलंबित आहे. उपरोक्त कार्यालयाचे भाडे देय ठरल्यानंतर त्यास एक वर्षापेक्षा अधिक कालावधी झालेला असल्याने सदर प्रस्तावास प्रशासकीय मंजुरी मिळणेबाबत नियंत्रक, वैध मापन शास्त्र यांनी संदर्भ क्र. २ अन्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे.

२. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण (म्हाडा) यांचेकडून संगणकीय प्रणालीद्वारे तयार केलेले प्रलंबित भाडे देयक निरीक्षक, वैधमापनशास्त्र, माहिम विभाग कार्यालयास प्राप्त झाले असून खालील तक्त्यांत दर्शविलेल्या कालावधीतील प्रलंबित भाड्याची रक्कम महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण (म्हाडा) यांना अदा करणे आवश्यक आहे :-

| अ. क्र. | कार्यालयाचे नांव | कालावधी | प्रति रूम प्रलंबित भाडे | एकूण रूम | देयकाची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १. | निरीक्षक, वैध मापन शास्त्र, माहिम विभाग | माहे नोव्हेंबर, २०१४ ते मार्च, २०२४ | रू.१,४५,७८५/- | ०३ | रू.४,३७,३५५/- |
| **एकूण रक्कम (अक्षरी रूपये चार लाख सदतीस हजार तीनशे पंचावन्न मात्र)** | | | | | **रू.४,३७,३५५/-** |

३. उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई जिल्हा क्र.१ यांच्या अधिनस्त असणारे निरीक्षक, वैध मापन शास्त्र, माहिम विभाग या निरीक्षक कार्यालयाच्या प्रलंबित भाड्यापोटी देय ठरणारे प्रलंबित भाडे देयक रक्कम **रूपये.४,३७,३५५/- (अक्षरी रूपये चार लाख सदतीस हजार तीनशे पंचावन्न मात्र) महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण (म्हाडा) यांना अदा करण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मंजूरी देण्यात येत आहे.**

४. उपरोक्त प्रयोजनासाठी येणारा खर्च मागणी क्र. एम-३, ३४७५, इतर सर्वसाधारण आर्थिक सेवा (००) (१०६) वजने व मापे यांचे विनियमन (००), (००) (०१) वजने व मापे विनियमन (३४७५००९३) नियंत्रक, उप नियंत्रक, सहायक नियंत्रक व वजने व मापे यांचे कार्यालय (अनिवार्य) १४-भाडेपट्टी व कर या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.-विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५ मधील सोबतचे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला उप विभाग- एक मधील अ.क्र.६ नियम ४० (१) मधील तरतूदीनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन प्रस्तुत ज्ञापन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन ज्ञापन हे महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०३०६१६०८३३११०६ असा आहे. सदर ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

POOJA PRASAD MANKAR

Digitally signed by POOJA PRASAD MANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=2587c101141ff0822d1f39f866ca3537dfc0e52728f898604a75ff77b46e7415, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3063036B7F64E995ED6A8BC7C9FBB1A5A10E6562F73D65107AD668D006B3B164, cn=POOJA PRASAD MANKAR
Date: 2025.03.06 16:09:55 +05'30'

**( पूजा मानकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत: माहिती तथा उचित कार्यवाहीसाठी.**

१) नियंत्रक, वैध मापन शास्त्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अ.ना.पु.व ग्रा.सं.विभाग, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर कार्यालयाचे प्रलंबित भाडे देयक अदा करण्याकरीता वित्त विभागास निधी मुक्त करण्याबाबत प्रस्ताव सादर करण्यात यावा.
३) वित्त विभाग (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई
४) सह नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई महानगर विभाग
५) उप नियंत्रक, वैध मापन शास्त्र, मुंबई जि.क्र.१
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) निवडनस्ती (ग्रासं-३)